देण्याबाबतची कार्यपध्दती.

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
शासन परिपत्रक क्रमांक : टिआरएस-१४०१/३१,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ३० ऑक्टोबर, २००१.

# परिपत्रक

महाराष्ट्र राज्य अतिथी नियमानुसार घोषित करण्यात आलेल्या राज्य अतिथींच्या यादीत समाविष्ट असलेल्या मान्यवरांची स्वागताची, परिवहनाची, निवासाची व भोजनाची व्यवस्था राजशिष्टाचार उपविभागाकडून केली जाते. यासाठी येणा-या खर्चाची तरतूदही या उपविभागा कडून केली जाते. या राज्य अतिथींच्या यादीत समावेश नसलेले केन्द्र व इतर राज्यातील कित्येक मान्यवर व शासकीय अधिकारीही शासकीय कामा निमित्त महाराष्ट्राला भेटी देत असतात. अशा मान्यवरांना,अधिका-यांना राज्य अतिथीचा दर्जा देवून त्यांची व्यवस्था व त्यावरील खर्च राज्य शासनाने करण्याबाबतचे प्रस्ताव संबंधित मंत्रालयीन विभागाकडून मुख्य सचिवांना व मा.मुख्यमंत्र्यांना सादर करण्यात येतात. असे प्रस्ताव मुख्य सचिवांना/मा.मुख्यमंत्र्यांना सादर करण्यापूर्वी कोणत्या निकषाच्या आधारे तपासावेत याबाबतच्या मार्गदर्शक सूचना या विभागाचे परिपत्रक क्र.राअति-१७९६/प्र.क्र.२७/९६/का.३१, दि.७ नोव्हेंबर, १९९६ अन्वये देण्यात आल्या आहेत. तथापि या सूचनांची दखल न घेताच कित्येक मान्यवरांना/अधिका-यांना राज्य अतिथी म्हणून सोयी सुविधा उपलब्ध करुन देण्याचे प्रस्ताव मुख्य सचिवांना/ मा.मुख्यमंत्र्यांना सादर केले जातात असे प्रकर्षाने आढळून आले आहे. यामुळे अनावश्यक पत्रव्यवहार आणि कार्यालयीन काम निर्माण होते. यापुढे असे प्रकार घडू नयेत म्हणून उपरोल्लेखित परिपत्रकातील सूचना सर्व संबंधीतांच्या मार्गदर्शनार्थ पुन्हा खाली नमूद करण्यात येत आहेत.

अ) ज्या मान्यवरांना/अधिका-यांना राज्य अतिथी म्हणून सुविधा उपलब्ध करुन देण्याचा

प्रस्ताव आहे ते केन्द्र शासन अथवा महाराष्ट्र शासनाने महाराष्ट्रात आयोजीत केलेल्या बैठकींसाठी/कार्यक्रमासाठी व या राज्याच्या कामासाठी येत आहेत किंवा कसे,

ब) त्यांच्या भेटीने राज्याचा काही भरीव फायदा होणार आहे का ,

क) प्रायोजित भेटीचा कार्यक्रम संबंधित मान्यवरांच्या कार्यालयाकडून अधिकृतरित्या प्राप्त झाला आहे का ,

याशिवाय

ड) संबंधित मुख्य मान्यवरांनाच राज्य अतिथी मानण्या बाबत प्रस्ताव असावेत.

इ) "राज्य अतिथी" समजण्याचा कालावधी हा शासकीय कामकाजाच्या कालावधी पुरताच व जास्तीत जास्त तीन दिवसाचा असावा.

यापुढे असे प्रस्ताव सादर करताना वरील निकषांचे पालन करणे अत्यंत आवश्यक राहील. या निकषांचे काटेकोरपणे पालन झाले आहे याची खात्री झाल्यावरच असे प्रस्ताव मंत्रालयीन विभाग प्रमुखाने मुख्य सचिवांना राजशिष्टाचार उपविभागा मार्फत आदेशासाठी सादर करावेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

प्रधान सचिव व मुख्य राजशिष्टाचारअधिकारी.

प्रति,

मुख्य सचिव,
सर्व अपर मुख्य सचिव,
सर्व प्रधान सचिव,
मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
मा.उपमुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
सर्व सचिव,
सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
सर्व मंत्रालयीन विभाग,
निवड नस्ती.